राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान (एनएमअेइटी) अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (एसएमएसपी) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत ग्राम बिजोत्पादन कार्यक्रम सन २०१९-२० मध्ये राबविण्याकरीता अनुसुचित जाती संवर्गाकरिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: योजना ३३१९/प्र.क्र.१११/१अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २० मार्च, २०२०

वाचा :-

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या संकेत स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्राज्ञान अभियान (एनएमअेइटी) अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (एसएमएसपी) बाबतच्या मार्गदर्शक सूचना.
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. No.12-01/2015, S.D.-I, दि. ०९.११.२०१५.
३) केंद्र शासनाचे निधी वाटपाबाबतचे पत्र क्र.१०-२/२०१८-SD.VI, दि.०६ जुन, २०१८.
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. योजना ३३१८/प्र.क्र.१३५/१अे, दि.३१ जुलै, २०१८.
५) केंद्र शासनाचे निधी वाटपाबाबतचे पत्र क्र.१०-२/२०१८-SD.VI, दि.२० नोव्हेंबर, २०१८.
६) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक पुरक १५१८/ प्र.क्र.१८/ १अे, दि.१८ सप्टेंबर, २०१८.
७) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: पूरक १५१८/प्र.क्र.२२५/१अे, दि.१५ मार्च २०१९.
८) केंद्र शासनाचे पत्र क्र.१०-२/२०१८-SD.VI, दि.११ जुन, २०१९

**प्रस्तावना :-**

केंद्रीय योजना आयोगाने नियुक्त केलेल्या बी.के.चतुर्वेदी समितीच्या शिफारशी केंद्र शासनाने स्विकारलेल्या आहेत. त्यास अनुसरून सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुनर्रचना ६६ केंद्र पुरस्कृत योजनांमध्ये करण्यात आलेली आहे. सन २०१४-१५ पासून सदर पुनर्रचित योजनांमधील काही योजना एकत्रित करून अभियानाच्या स्वरूपात राबविण्याचे केंद्र शासनाने निश्चित केलेले आहे. त्यामध्ये राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान (एनएमअेइटी) या केंद्र पुरस्कृत अभियानांतर्गत बियाणे लागवड व साहित्य उप-अभियान (एसएमएसपी) राबविण्यात येत आहे.

बियाणे तपासणी प्रयोगशाळा सुधारणे, बियाणे उत्पादन संस्थांना नवीन बियाणे उत्पादन तंत्रज्ञान इ. आत्मसात करण्यासाठी सहाय्य करणे यासाठी दर्जेदार किंवा प्रमाणित बियाण्यांचे उत्पादकतेमध्ये नवनवीन तंत्रज्ञानाचा समावेश करून सध्या अस्तित्वात असलेली योजना एका अभियानाच्या स्वरूपात संवर्धित व विस्तारीत करण्यामुळे शेतकऱ्यांना वाजवी दरामध्ये व ठराविक वेळेमध्ये दर्जेदार बियाण्यांची उपलब्धता होण्यामध्ये सुधारणा करण्याच्या अनुषंगाने सदर उप- अभियान केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राबविण्यात येत आहे. या उप-अभियानाच्या कक्षेत शेतकऱ्यांना प्रमाणित बियाणे पुरवठा करण्यासाठी केंद्रवर्ती बियाणे उत्पादन करण्यापासून बियाणे क्षेत्राच्या विकासासाठी हितावह पायाभूत

सुविधा निर्माण करण्यासाठी सहाय्य करणे, नैसर्गिक आपत्तीच्या वेळी बियाण्यांची गरज भागविण्यासाठी बियाणे बँकेत जमा करणे इ. अशी ही संपुर्ण बियाणे साखळी समाविष्ट आहे. या उप-अभियानामध्ये बीज ग्राम कार्यक्रम, तालुका बीजगुणन प्रक्षेत्रांचे बळकटीकरण, प्रमाणित बियाणे उत्पादनास सहाय्य या बाबींचा समावेश आहे.

राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेतील "ग्राम बीजोत्पादन कार्यक्रम" व "प्रमाणित बियाणे उत्पादन कार्यक्रम" राबविण्यासाठी संदर्भ क्रमांक ६ च्या कृषि व पदुम विभागाच्या दि.१८ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये राज्य हिस्सा रू.७७.०० लाख इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. तसेच, राज्य हिस्सा रू.११०५.२९ लाख इतका निधी संदर्भ क्रमांक ७ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे.

सन २०१८-१९ मध्ये सदर योजनेकरिता एकूण केंद्र हिस्सा निधी रु. १४३७.३४ लाख इतका निधी केंद्र शासनाने संदर्भ क्र.३ व संदर्भ क्र ५ येथील पत्रान्वये उपलब्ध करून दिलेला होता. सदर केंद्र हिश्श्यापैकी महाबीजकडून रु. ७७६.२५ लाख इतका निधी खर्च करण्यात आला आहे. महाबीजकडून प्रमाणित बियाणे उत्पादन कार्यक्रमासाठी असलेला रु. ४१.६० लाख इतका निधी केंद्र शासनास महाबीजने परत केलेला आहे. त्यामुळे ग्रामबिजोत्पादन कार्यक्रमाकरिता केंद्र हिश्श्यातील एकुण रु.६१९.५० लाख इतका निधी महाबीजकडे शिल्लक आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र.८ येथील दि.११.०६.२०१९ रोजीच्या पत्रान्वये अनुसुचित जाती प्रवर्गासाठी शिल्लक असलेला रु.६६६.१९ लाख इतका अखर्चित निधी खर्च करण्यास मान्यता दिलेली आहे. तथापि, प्रत्यक्षात महाबीजकडे या प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याचा रू. ६१९.५० लाख इतका निधी महाबीजकडे शिल्लक आहे. सदर केंद्र हिश्शाच्या शिल्लक निधीस अनुसरून केंद्र हिश्श्याच्या ४० टक्के प्रमाणे राज्य हिश्श्याकरिता रू.४१२.९९ लाख निधी आवश्यक आहे. तथापि, संदर्भ क्र.६ व संदर्भ क्र.७ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या राज्य हिश्श्याच्या एकूण रु. ११८२.२९ लाख निधी पैकी रू. ६८.३२ लाख महाबीजकडे शिल्लक आहे.

त्यानुसार केंद्र हिश्श्याच्या तुलनेत ४० टक्के प्रमाणे आवश्यक असणाऱ्या रू.४१२.९९ लाख निधीमधुन राज्य हिश्श्याचा शिल्लक रू. ६८.३२ लाख निधी वजा करून करून उर्वरित राज्य हिस्सा रु. ३४४.६७ लाख उपलब्ध करुन देण्याची व सन २०१८-१९ मधील राज्य हिश्श्याचा अखर्चित रु. ६८.३२ लाख निधी खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेतील "ग्राम बीजोत्पादन कार्यक्रम" व "प्रमाणित बियाणे उत्पादन कार्यक्रम" यासाठी सन २०१९-२० च्या हंगामामध्ये ( केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० प्रमाणे ) अनुसुचित जाती घटकासाठी (लेखाशीर्ष

२४०१ ए ३३२) राज्य हिश्याकरीता रु. ३४४.६७ लाख इतकी तरतुद महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला यांना वितरीत करण्यात येत आहे. तसेच, सन २०१८-१९ मधील राज्य हिश्श्याचा अखर्चित रु. ६८.३२ लाख निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| **राज्य हिस्सा लेखाशिर्ष** |
|---|
| मागणी क्रमांक - डी-३,<br>२४०१ पिक संवर्धन<br>७८९, अनुसुचित जाती उपयोजना<br>००- अनुसुचित जाती उपयोजनेंतर्गत योजना<br>(००) (१६) कृषि उन्नती योजना - बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (केंपुयो),<br>राज्य हिस्सा - ४०%<br>(२४०१ ए ३३२) ३३ अर्थसहाय्य |

३. **सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.**

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

६) सदर निधी अनुसूचित जाती संवर्गातील लाभार्थ्यांसाठीच खर्च करण्यात येईल याबाबतची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.४४/अर्थ ३, दिनांक १ एप्रिल, २०१९, वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक ०८जुलै, २०१९ व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक २२ जानेवारी २०२० मधील अटी व शर्तीची पुर्तता करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४७/२०२०/व्यय-१, दिनांक ०९ मार्च, २०२० अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२०१७१७३०४७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.03.20 17:20:12 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, महाबीज भवन, कृषिनगर, अकोला.
६. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
११. उप सचिव (२-ओ)/(निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती (कार्यासन १-ओ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.